अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील उपसंचालक-गट `अ` संवर्गातील अधिका-यांचा परिवीक्षा कालावधी समाप्त करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## नियोजन विभाग

**शासन आदेश क्रमांक-आरटीएन १६१३/प्र.क्र.२८/का-१४२७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
६ वा मजला, विस्तार इमारत, मंत्रालय,
मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३० जुलै, २०१५

वाचा :- १) नियोजन विभाग, शासन आदेश क्र.आरटीएन-१६११/प्र.क्र.१३/का-१४२७, दि.०३/०२/२०११ व दि.२४/०२/२०११
२) अर्थ व सांख्यिकी संचालनालयाचे पत्र क्र.परिवी-१४१३/उसं/३७/प्रशा-२/४३०, दि.१५ एप्रिल, २०१५

**कार्यालयीन आदेश :**

उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयांन्वये अर्थ व सांख्यिकी संचालनालयात `उपसंचालक` पदावर अनुक्रमे १३ व १ अशा १४ अधिका-यांची नामनिर्देशनाने नियुक्ती करण्यात आली आहे. सदरहू नियुक्ती आदेशात संबंधित अधिकारी दोन वर्षे परिवीक्षा कालावधीवर राहतील, असे नमूद करण्यात आलेले आहे.

२. त्यांच्या नियुक्ती आदेशात नमूद केल्याप्रमाणे, दोन वर्षांच्या कालावधीत विहित विभागीय परीक्षा (जर काही असल्यास) आणि संगणक हाताळणी परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक होते. तसेच, हिंदी, मराठी भाषा परीक्षा उत्तीर्ण होणे किंवा त्यातून सूट मिळणे आवश्यक होते.

३. सदरहू दोन वर्षांच्या परिवीक्षा कालावधीत परिवीक्षा अधिका-यांनी जर रजा उपभोगलेली असेल, तर त्या रजेच्या कालावधीएवढा परिवीक्षा कालावधी शासन परिपत्रक क्र.५३४६/४६, दि.२६ ऑगस्ट, १९५२ नुसार वाढविणे आवश्क आहे.

४. उपसंचालक-गट `अ` संवर्गात उपरोक्त आदेशान्वये नियुक्त करण्यात आलेल्या अधिका-यांच्या संदर्भात, विहित अटी व शर्तींची पूर्तता होत असल्याने त्यांनी उपभोगलेल्या रजा विचारात घेऊन परिवीक्षाधीन अधिका-यांचा पुढील विवरणपत्रात त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या दिनांकास परिवीक्षा कालावधी संपुष्टात आणण्यात येत आहे व सदर पदावर त्यांची नियमित /स्थानापन्न नियुक्ती करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | परिवीक्षाधीन अधिका-याचे नांव | नियुक्ती दिनांक | परिवीक्षा कालावधी संपुष्टात आल्याचा दिनांक |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.अ.अ.खंडारे | ०१/०३/२०११ | ३०/०३/२०१३ |
| २ | श्रीमती रु.प्र.थोते | ०१/०३/२०११ | ०१/०५/२०१३ |
| ३ | श्रीमती उ.ग.नाईक | ०१/०३/२०११ | १२/०३/२०१३ |
| ४ | श्रीमती स.शं.यादव | ०१/०३/२०११ | १९/०४/२०१३ |

५. हे शासन आदेश सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.एसआरव्ही-१०९४/१८३७/प्र.क्र.१८/९५/आठ, दि.२८ मार्च, १९९५ नुसार सूचना लक्षात घेऊन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०७३०१२४०१७५७१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Priyanka Ranjan Chhapwale

Digitally signed by Priyanka Ranjan Chhapwale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=55fdd77fa8877b50fd182206f763c590c30ce698809f79d37b145fd63e375059, cn=Priyanka Ranjan Chhapwale
Date: 2015.07.30 15:01:41 +05'30'

**(प्रि. रं.छापवाले)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
२) सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, कोकण विभाग, नवी मुंबई/नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/औरंगाबाद.
३) उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण विभाग, नवी मुंबई/नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/औरंगाबाद.
४) संबंधित अधिकारी (अर्थ व सांख्यिकी संचालनालयामार्फत).
५) निवडनस्ती.